महाराष्ट्र वैद्यकीय व आरोग्य सेवा, गट-अ जिल्हा आरोग्य अधिकारी संवर्गातील बदल्या / पदस्थापना

# महाराष्ट्र शासन
## सार्वजनिक आरोग्य विभाग
**शासन आदेश क्रमांकः बदली-१३१८/प्र.क्र.२५५/सेवा-२ (२)**

गो.ते.रुग्णालय इमारत,१० मजला, ए विंग,
मंत्रालय,मुंबई -४०० ००१
दिनांक : २९ ऑगस्ट,२०१८

**शासन आदेश -**

महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्ये पार पाडताना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५ मधील कलम ४ (४) (दोन) व ४ (५) मधील तरतुदीनुसार महाराष्ट्र वैद्यकीय व आरोग्य सेवा,गट-अ, वेतनश्रेणी रु. १५६००-३९१०० ग्रेड पे रु.६६०० मधील जिल्हा आरोग्य अधिकारी संवर्गातील अधिकाऱ्यांची खालीलप्रमाणे बदलीने पदस्थापना करण्यात येत आहे:-

| अ.क्र. | अधिकाऱ्याचे नांव व सध्याची पदस्थापना | बदलीने पदस्थापना |
|---|---|---|
| १ | डॉ. हर्षला सुधाकर वेदक, जिल्हा आरोग्य अधिकारी, जिल्हा परिषद सांगली | दि. ३१.५.२०१८ अन्वये करण्यात आलेल्या पदस्थापनेत अंशत: बदल करुन निवासी वैद्यकीय अधिकारी (बाह्यसंपर्क), कोल्हापूर या रिक्त पदी (विनंतीनुसार) |
| २ | डॉ. बी. एस. गिरीगोसावी, जिल्हा माता बालसंगोपन अधिकारी, सांगली | जिल्हा आरोग्य अधिकारी, जिल्हा परिषद, सांगली या डॉ. हर्षला वेदक यांच्या बदलीने रिक्त झालेल्या पदी (विनंतीनुसार) |

२. बदली करण्यात आलेल्या अधिकाऱ्यास त्यांच्या नवीन पदस्थापनेच्या ठिकाणी हजर होण्याकरिता तात्काळ कार्यमुक्त करण्यात यावे आणि संबंधित अधिकाऱ्याने त्यांना दिलेल्या पदस्थापनेच्या ठिकाणी त्वरीत हजर होऊन त्याबाबतचा अहवाल संचालक, आरोग्य सेवा मुंबई यांना व शासनास सादर करावा.

३. बदली झालेल्या अधिकाऱ्यांना कोणत्याही प्रकारची रजा मंजूर करण्यात येऊ नये, अन्यथा रजा मंजूर करणाऱ्या सक्षम प्राधिकाऱ्याविरुध्द शिस्तभंगविषयक कारवाई करण्यात येईल.

४. बदली झालेल्या अधिकाऱ्यांनी त्यांना कार्यमुक्त केल्यानंतर, अनुज्ञेय पदग्रहण अवधीत नवीन पदस्थापनेवर रुजू व्हावे, जे अधिकारी या कालमर्यादेचे पालन करणार नाहीत आणि पदस्थापनेच्या ठिकाणी

हजर न होता परस्पर गैरहजर राहतील, अशा अधिकाऱ्यांची अनुपस्थिती “अनधिकृत अनुपस्थिती” म्हणून समजण्यात येईल व पर्यायाने त्यांच्या सेवेत खंड होईल याची जाणीव सर्व संबंधितांना करुन देण्यात येत आहे.

५. जे अधिकारी त्यांच्या पदस्थापनेच्या ठिकाणी हजर होणार नाहीत त्यांचेविरुध्द संचालनालयाने वेळीच प्रशासकीय कारवाई सुरु करावी व आवश्यकतेनुसार प्रस्ताव शासनाच्या मान्यतेसाठी सादर करावा. या प्रकरणी वेळोवेळी शासनास अवगत करावे व अनुपालन अहवाल शासनास विहित कालमर्यादेत सादर करावा.

६. बदलीच्या आदेशात बदल करुन घेण्यासाठी कोणत्याही अधिकाऱ्याने प्रत्यक्ष वा अप्रत्यक्ष दबाव आणण्याचा प्रयत्न केल्यास असे अधिकारी शिस्तभंग विषयक कारवाई करण्यास पात्र ठरतील.

७. सदर आदेश तात्काळ अंमलात येतील.

८. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८०८२९१११५२१९११७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Vishnudas Pundlikrao Ghodke

Digitally signed by Vishnudas Pundlikrao Ghodke
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Public Health Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=514c2e5ad6ac71c69b99a86a5fe5189556b7a95d5896bbb81496f403bb58ac3e, cn=Vishnudas Pundlikrao Ghodke
Date: 2018.08.29 17:18:11 +05'30'

**(वि.पुं.घोडके)**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१) आयुक्त आरोग्य सेवा तथा अभियान संचालक राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई
२) संचालक, आरोग्य सेवा, मुंबई
३) अतिरिक्त संचालक, आरोग्य सेवा (सर्व)
४) सहसंचालक, आरोग्य सेवा(अर्थ व प्रशासन), मुंबई
५) उपसंचालक, आरोग्य सेवा, कोल्हापूर मंडळ कोल्हापूर
६) जिल्हा शल्यचिकित्सक, सामान्य रुग्णालय कोल्हापूर
७) जिल्हा आरोग्य अधिकारी, जिल्हा परिषद, सांगली
८) महालेखापाल (लेखा परिक्षा) महाराष्ट्र - १ , मुंबई /महाराष्ट्र - २, नागपूर

९) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र - १ , मुंबई /महाराष्ट्र - २, नागपूर
१०) जिल्हा कोषागार अधिकारी, सांगली/कोल्हापूर
११) मा.मुख्यमंत्री यांचे स्वीय सहायक
१२) मा.मंत्री (आरोग्य) / मा.राज्यमंत्री (आरोग्य) यांचे खाजगी सचिव
१३) मा.प्रधान सचिव (आरोग्य) यांचे स्वीय सहायक
१४) संबंधित अधिकारी (संचालक, आरोग्य सेवा, संचालनालय, मुंबई यांचेमार्फत)
१५) निवड नस्ती (सेवा - २ )